सिन्नर नगरपरिषद जि. नाशिक येथे महाराष्ट्र नगर परिषदा नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ च्या कलम ३१६ (ख) अन्वये अधिकारी नेमणेबाबत

**महाराष्ट्र शासन,**
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्र. एमयूएन- १०१०/मुमंस ७४/प्रक्र- ३९/नवि-१७:
मंत्रालय, मुंबई ४०००३२ दिनांक ८ जून २०१०

**प्रस्तावना**: शासनाचे दि. १८ मे २०१० च्या अधिसूचनेद्वारे महाराष्ट्र नगर परिषदा नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ च्या ३१३(२) च्या कलमान्वये सिन्नर नगर परिषद विसर्जित करण्यात आली असून परिणामी उक्त अधिनियमाच्या कलम ३१६ (ख) मधील परिस्थिती निर्माण झाल्यामुळे उक्त अधिनियमाच्या कलम ३१६(ख) अन्वये सिन्नर नगरपरिषद येथे अधिकारी नेमणूक करणेची बाब शासनाचे विचाराधीन होती.

**शासन निर्णय** : सिन्नर नगर परिषदेच्या "नगरपरिषद, अध्यक्ष, उपाध्यक्ष, निरनिराळया समित्या, परिषद सदस्य व मुख्याधिकारी यांच्याकडे महाराष्ट्र नगर परिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम १९६५ या अधिनियमान्वये किंवा त्या त्या वेळी अंमलात असलेल्या अन्य कोणत्याही कायद्याअन्वये निहित असलेले किंवा त्यांनी वापरावयाचे सर्व अधिकार व करावयाची सर्व कामे करण्यासाठी" महाराष्ट्र शासन याद्वारे निवासी नायब तहसिलदार ता. सिन्नर जि. नाशिक यांची या आदेशाच्या दिनांकापासून नेमणुक करीत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(वि.बा.सुपेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव
प्रधान सचिव/सचिव मा. मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
उपसचिव राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासन भवन मंत्रालयासमोर, मुंबई ४०००३२
प्रधान सचिव/सचिव/सहसचिव/उपसचिव (सर्व) नगर विकास विभाग, मंत्रालय मुंबई
महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई
प्रादेशिक संचालक, नगरपालिका प्रशासन, नाशिक विभाग, नाशिक
जिल्हाधिकारी, जि. नाशिक
संचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई ( योग्य अशी प्रेस नोट काढण्यासाठी )
मुख्याधिकारी, नगर परिषद सिन्नर
तहसिलदार, ता. सिन्नर, जि. नाशिक.
निवासी नायब तहसिलदार ता. सिन्नर, जि. नाशिक.
कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
यांना सदरचा शासन निर्णय विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यासाठी.
निवडनस्ती (नवि-१७)